**लघु पाटबंधारे तलाव, मरसुळ, ता. उमरखेड, जि. यवतमाळ प्रकल्पाच्या धरण व कालव्याच्या विशेष दुरूस्ती कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/ (प्र.क्र.५५७/२०१६)/ सिं.व्य.(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ३०/०६/२०१७.

**वाचा :-** १.कार्यकारी संचालक,विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.६२८२/विपाविम/कातां-७(२)/अपामं/सिं व्य /(५०२/२०१५) /सन २०१६, दि.१.०८.२०१६.

२. शासन निर्णय संकीर्ण २०१६/(२७/२०१६)/लपा-२, दि.२६.०५.२०१७.

**प्रस्तावना :--**

यवतमाळ जिल्हयाच्या उमरखेड तालुक्यातील मरसुळ लघु पाटबंधारे प्रकल्प हा गोदावरी खोरे अंतर्गत पैंनगंगगा उपखोऱ्यात आहे. हा प्रकल्प मौ.मरसुळ, ता. उमरखेड, जि यवतमाळ गावाच्या वरील बाजूस स्थानीक नाल्यावर १९७८ मध्ये बांधण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पाच्या माती धरणाची लांबी ३२१ मीटर असून महत्तम उंची २०.०० मीटर आहे. प्रकल्पास ४३.०० मीटर लांबीचा दगडी सांडवा आहे. प्रकल्पाची एकूण साठवण क्षमता २.३७ दलघमी आहे. प्रवाही सिंचन पूर्ण क्षमतेने न होण्यामागे वितरण प्रणालीची बांधकामे, जलसेतू, विमोचके, पूलांचे दगडी बांधकामांचे पॉइंटिंग जीर्ण होऊन उखडले जाऊन बांधकामे पडणे ही आहेत.त्यामूळे कालव्याच्या पुढील भागात पाणी जात नसल्याने ८५ % लाभक्षेत्र सिंचनापासून वंचित राहते. धरण सुरक्षिततेची कामे व वितरण प्रणाली वरील बांधकामाची पुर्नस्थापना केल्यास धरणाचे आयुष्य वाढून पूर्ण क्षेत्र सिंचनाखाली येणार आहे. सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापर संस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. सदर काम केल्यामुळे ४३३ हे. क्षेत्र पूर्नस्थापित होणार आहे. याअनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर दुरूस्तीच्या कामाकरीता विशेष दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर अंतर्गत यवतमाळ जिल्हयाच्या उमरखेड तालुक्यातील मरसुळ, ता. उमरखेड, जि यवतमाळ प्रकल्पाच्या कालव्याच्या बांधकाम दुरूस्तीच्या कामांसाठी विशेष दुरूस्ती अंतर्गत संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये प्रस्तावित कामांच्या रू.१,६६,५५,०२६/- व अनुषंगिक खर्च रू.१,६४,४९३/- अशा एकूण रू. १,६८,१९,५१९/- (रू. एक कोटी अडूसष्ट लक्ष एकोणवीस हजार पाचशे एकोणवीस फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारान्वये व आंतरवित्त सल्लागार तथा उप सचिव यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनानुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

२. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.

३. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने, बाहय दरसूचीबाबी व वहन अंतरे सक्षमस्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

४. कालवा स्वच्छता व माती भरावाची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करून घ्यावे.

५. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

६. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणाराखर्च ४७०२ लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (११) विदर्भ प्रदेश, (११) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४९९) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. १०/सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६३०१६५६४२५७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.06.30 16:53:48 +05'30'

**(न.गौ .बसेर)**

**शासनाच्या अवर सचिव**

सोबत: परिशिष्ट-अ

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन, मुंबई.
४. मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद,विधानभवन, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई.

६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई.
७. मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधानसचिव(जलसंपदा)यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०.सचिव(जसंव्य व लाक्षेवि)यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
११.महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१२.महालेखापाल-२ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१३.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
१५.आंतरवित्त सल्लागार व उप सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.अधीक्षक अभियंता, यवतमाळ सिंचन मंडळ, यवतमाळ.
१८.अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ.
१९. कार्यकारी अभियंता, यवतमाळ पाटबंधारे विभाग, यवतमाळ.
२०.सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**परिशिष्ट-अ**

**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१६/(प्र.क्र.५५७/२०१६)/ सिं.व्य.(कामे), दि.३०/०६ /२०१७**

**चे सहपत्र**

| अ.क्र. | कामाचा तपशिल | प्र.मा.रक्कम (रूपयात) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | धरण सुरक्षितता कामे | २९,४१,८४८/- |
| २ | कालवा, मातीकामे | ६६,२७,७३३/- |
| ३ | विमोचक तसेच इतर बांधकाम दुरूस्ती | ६१,८७,२३४/- |
| ४ | अस्तरीकरणाची कामे | ५,४४,४८६/- |
| ५ | इतर कामे | १,४८,०४०/- |
| ६ | पाणी वापर संस्था विषयक कामे | २,०५,६८५/- |
| | **एकूण बांधकामाधिन खर्च** | **१,६६,५५,०२६/-** |
| ७ | अनुषंगिक खर्च | १,६४,४९३/- |
| | **एकूण** | **१,६८,१९,५१९/-** |

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.06.30 16:54:01 +05'30'

(न.गौ .बसेर)
शासनाच्या अवर सचिव